**औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील विद्यार्थ्यासाठी वसतीगृह इमारत बांधकाम व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करुन देणे. या चालू जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रशामा-२०१०(३३७/१०)/व्यशि-२,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ००३२
दिनांक : २५ नोव्हेंबर, २०१०

संदर्भ : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक जिवायो १००७/ प्र.क्र. ३९ / का, १४४४, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८

२) नियोजन विभाग, शासन पत्र क्रमांक जिवायो २०१०/ प्र.क्र. ९७ / का, १४८१, दिनांक २० मे, २०१०.

३) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा. मुंबई यांचे पत्र क्र.१४/एफवायपी/जिवायो/प्रशाइमा/२०११-१२, दिनांक २१ ऑक्टोंबर २०१०.

**प्रस्तावना :** कामगार व कामगार कल्याण (औ.प्र.संस्था) या विकासक्षेत्रांतर्गत जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेंतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील विद्यार्थ्यासाठी वसतीगृह इमारत बांधकाम व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करुन देणे ही योजना जिल्हास्तरावर राबविण्यांत येत आहे. या योजनेंतर्गत राज्यामध्ये कार्यरत असलेल्या औ.प्र.संस्थांच्या वसतीगृह बांधकामांसाठी निधी उपलब्ध करून दिला जातो.

२. सद्यस्थितीत राज्यामध्ये ४१६ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था कार्यरत आहेत. त्यापैकी १५६ औद्योगिक प्रशिक्षण सस्थांमध्ये प्रशिक्षणार्थ्यांना राहण्याच्या सोयी करिता वसतीगृहे बांधण्यात आलेली आहेत. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत जें प्रशिक्षणार्थी शिक्षणासाठी येतात ते ब-याचदा डोगंराळ व दुर्गम भागातून येत असतात, वसतीगृहाच्या सोयी नसलेल्या ठिकाणी व्यवसाय प्रशिक्षण घेण्यास विद्यार्थी उत्सुक नसतात. तसेच तालुक्याच्या ठिकाणी, त्यांची राहण्याची व जेवणाची सोय व अन्य आवश्यक सोयी सुविधा नसल्यामुळे, औ.प्र.संस्थेमध्ये शिक्षणासाठी येणारे विद्यार्थी हे आर्थिकदष्टया दुर्बल असतात. आर्थिक परिस्थीतीमुळे प्रशिक्षणाची इच्छा असूनही प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण अर्धवट सोडून निघून जातात. परिणामी असे विद्यार्थी रोजगार व स्वयंरोजगारक्षम व्यवसाय प्रशिक्षणापासून वंचित राहतात. ही बाब लक्षात घेऊन विद्यार्थ्यांना तांत्रिक शिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी वसतीगृहाची सोय उपलब्ध करुन देणे आवश्यक ठरते.

३. सध्या ४१६ शासकीय औ.प्र.संस्थांपैकी १५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रशिक्षणार्थ्यांना राहण्याच्या सोयीकरिता वसतीगृहे बांधकाम बांधण्यांत आलेली आहेत. सध्या राज्यामध्ये ९४ वसतीगृहाची बाधकामे सुरू असून त्या बांधकामांसाठी निधी उपलब्ध करुन देणे व नविन वसतीगृहाच्या

ठिकाणी प्रशिक्षणार्थ्यांना आवश्यक त्या सोई सुविधा (पलंग व इतर सुविधा) उपलब्ध करून देण्यांसाठी निधीची आवश्यकता आहे. ही योजना राज्यात ब-याच वर्षापासून कार्यरत आहे. मात्र या योजने संदर्भातील शासन निर्णय उपलब्ध नाही. ही योजना जिल्हास्तरीय असल्यामुळे याबाबतच्या निधी अर्थसंकल्पित करणे व वितरीत करणे याबाबतची कार्यवाही जिल्हा विकास समितीमार्फत करण्यांत येते. त्यामुळे या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय उपलब्ध करुन देण्यांबाबत आग्रह धरण्यांत येत आहे. ही बाब लक्षांत घेऊन या योजनेस नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : उपरोक्त विवेचन लक्षांत घेऊन **"औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील विद्यार्थ्यासाठी वसतीगृह इमारत बांधकाम व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करुन देणे"** या योजनेस या शासन निर्णयाद्वारे नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे. या योजनेद्वारे उपलब्ध होणारा निधी खालील बाबीवर खर्च करण्यांत यावा.

१. औ.प्र.संस्थेच्या प्रशिक्षणार्थ्यासाठी वसतीगृहाचे बांधकाम करणे.
२. वसतीगृहामधील प्रशिक्षणार्थ्यांना वसतीगृहात सोई सुविधा (पलंग व इतर सुविधा) उपलब्ध करून देणे.
३. शासकीय औ.प्र.संस्थांमधील अनुशेषांतर्गत हाती घेण्यांत आलेली बांधकामे व नुतनीकरणाची कामे यासाठी निधी उपलब्ध करणे.

२. सदर योजना जिल्हास्तरीय असल्याने, जिल्हा नियोजन समितीकडे नियोजन विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सूचनेनुसार नियतव्ययाची मागणी संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी करावी. तसेच निधी अर्थसंकल्पीत होणे, वितरीत होणे तसेच खर्चाबाबतची पाठपुरावा करण्याची जबाबदारी संचालक (प्रशिक्षण) व संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील.

३. या योजनेद्वारे उपलब्ध निधीतून करण्यांत येणाऱ्या साधनसामग्री / फर्निचर / उपकरणे खरेदीस तांत्रिक मान्यता संचालक (प्रशिक्षण) यांनी देणे आवश्यक राहील.

४. दिनांक १६ फेब्रुवारी, २००८ च्या नियोजन विभागाच्या शासन निर्णयामधील मार्गदर्शक सूचनेनुसार कार्यवाही करावी.

५. या योजनेंतर्गत बांधकाम व इतर सोयी सुविधेचा खर्च भागविण्यासाठी जिल्हयाच्या मागणी क्रमाकांतर्गत स्वतंत्र संगणक सांकेतांक जिल्हा नियोजन समिती मार्फत प्राप्त करून घेण्याची जबाबदारी संचालक (प्रशिक्षण ) व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील.

हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१३/१४८१, दिनांक १.११.२०१० व अनौ.संदर्भ क्र.५४७/१४७१, दि.३.११.२०१० अन्वये तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र- १०.०८/ प्र.क्र. ७०/२००८/विनीयम, दि. १५ मे २००९ अन्वये सुधारीत करण्यांत आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, नियम क्रमांक २७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१०११२५२१४५५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सं.अ. बागेश्वर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति.

(१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा. मुंबई १.
(२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर. (संचालनालयामार्फत)
(३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती ----------- (संचालनालयामार्फत)
(४) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
(५) प्राचार्य , शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत)
(६) नियोजन विभाग, मंत्रालय (का.क्र.१४७१)
(७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(८) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कार्यासन क्रमांक साशि-१ व व्यशि-३
(९) निवड नस्ती.